आतां विश्वात्मकें देवें!
येणें वाग्यज्ञें तोषावें !!

प्रतिपत् चंद्र-रेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता!
शाहसूनो : शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते !!



# महाराष्ट्र

## पंचांग दिनदर्शिका

ज्ञानदेव शक ७१५
शिवशक ३३१

# विश्वशक ३६

महाराष्ट्र दिन
वर्ष ४५ वे

युधिष्ठिर शक ५१०६ | विक्रम संवत् २०६०-६१

स्वस्ति श्रीमन्नृपशालिवाहन शक १९२६ तारणनाम संवत्सर

## ६ निज श्रावण १९२६

दक्षिणायन
वर्षा ऋतु

| वार | शुक्ल पक्ष | | | कृष्ण पक्ष | | |
|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार | | ८ अष्टमी | १५ पौर्णिमा | | ७ सप्तमी | १४ चतुर्दशी |
| मंगळवार | १ प्रतिपदा | ९ नवमी | | २ द्वितिया | ८ अष्टमी गोपाळकाला | ३० अमावास्या |
| बुधवार | २ द्वितीया | १० दशमी | | ३ तृतिया | ९ नवमी | |
| गुरूवार | ३ तृतीया | ११ एकादशी | | ४ चतुर्थी संकष्टी | १० दशमी | |
| शुक्रवार | ४ चतुर्थी | १२ द्वादशी | | ५ पंचमी | ११ एकादशी अजा | |
| शनिवार | ५ पंचमी | १३ त्रयोदशी | | ६ षष्ठी | १२ द्वादशी | |
| रविवार | ७ सप्तमी | १४ चतुर्दशी | | ७ सप्तमी | १३ त्रयोदशी | |

**शकांचा प्रारंभ-काल**

ज्ञानदेव शक १
शके १२१२
श्रावण वद्य ८
श्रीकृष्ण जन्म

शिव शक १
शके १५९६
ज्येष्ठ शु. १३

महाराष्ट्र दिन
वर्ष १
शके १८८२

विश्व शक १
शके १८९१
आषाढ शु. ५

# महाराष्ट्र
# दिनदर्शिका : स्वरूप दर्शन
## लेखन क्रमांक : १

आम्ही हिंदूधर्मीय आहोत, असे म्हणण्यांत कोणताहि दोष नाही. मात्र आजमितीस यांत कांहीं गुणहि नाही, ही कटू वस्तुस्थिती आहे यामुळें ‘मी हिंदू आहे.’ ही निव्वळ पोकळ आणि निरर्थक घोषणा होऊन राहिली आहे.

जीवनाचा मूलगामी विचार करणें हाच यांवर उत्तम आणि सुयोग्य उपाय आहे. हा अत्यन्त व्यापक व दीर्घकालीन उद्यमाचा विषय आहे. जीवनांत मूलगामी परिवर्तन होऊन त्यांतील सर्व क्षेत्रें पूर्णतया बदलणें अत्त्यावश्यक आहे. याचाच एक प्राथमिक प्रयत्न यास्वरूपांत मी आपणापुढे ‘हिंदवी दिनदर्शिका’ सादर केली आहे. याला ‘महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिका’ असें

नांव दिले आहे. एका व्यापक दृष्टिकोनांतून या दिनदर्शिकेचें स्वरूप आणि इतर दिनदर्शिकेच्या तुलनेंत काय फरक आहे, त्याचें दिग्दर्शन करतो.

१) नाताळ, ईद, इत्यादि अन्यधर्मीय सण तसेच उत्सव आमच्या दिनदर्शिकेंत येणार नाहींत.

२) कोणत्याहि राजकारणी, समाजकारणी उदाहरणार्थ लोकमान्य टिळक, छत्रपती शाहू महाराज, छत्रपती शिवाजी महाराज असे कोणीहि—लोकोत्तर पुरूष असलें तरी—त्यांच्या पुण्यतिथी यांत येणार नाहीत. कारण त्या पुण्यतिथी नाहीत, तर ते श्राद्धदिन आहेत. त्या त्या वर्गसमूहांत त्याचें पालन व्हावे. त्याचप्रमाणें त्यांच्या जयंत्याहि यांत येणार नाहीत. कारण जयंत्या केवळ देवादिकांच्या आणि अवतारांच्या असतात. दत्तजयंति असते, नळजयंति कधी ऐकली का? रामजन्म, कृष्ण जन्म म्हणतात. रामपुण्यतिथि कधी ऐकली का?

३) पुण्यतिथी केवळ संत, महात्मे, सत्-पुरूषांच्या असतात. देहाचें आवरण टाकून ते ब्रह्मरूप झालेलें असतात. सर्वत्र व्याप्त होतात. ती पुण्यपर्वणी, तो पुण्यदिवस. म्हणून ती पुण्यतिथि. उदाहरणार्थ ज्ञानदेव, रामकृष्ण, विवेकानंद, रमणमहर्षि, गोंदवलेकर, स्वरूपानंद.

४)मनुष्यप्राण्याची जयंति,अथवाा वाढदिवस आम्हांस अभिप्रेत नाही. जन्मलेल्या मुलाची पशू अवस्था असते. त्यांत परिवर्तन होऊन पूर्ण मनुष्य अवस्था प्राप्त होण्यास जी वाढ व्हावी लागते त्यासाठीं ३/४ वर्षे लागतात. पूर्ण वाढीसाठीं आणखी २/३ वर्षे धरली तर मुलाचा वयवर्षे ७ पर्यन्त वाढदिवस करावा. पहिले वाढदिवस त्याला तितकेसे कळणार नाहीत. मात्र शेवटचे २ वाढदिवस त्याला चांगले कळतील. हे आपल्या हिंदूसंस्कारानुसार मुलाला कुंकवाचा पट्टा लावून ताम्हणांतील निरांजनानें त्यास औक्षण करून साजरे करावेत.

वयाच्या ७ व्या वर्षी— मुलाला चांगली समज आलेली असते— वाढदिवस बंद करावा. आतां त्याला वाढदिवस न म्हणता 'क्षयदिन' म्हणावा लागेल. तो क्षयदिनच आहे.

अस्तासजाय जेव्हां घेऊनि आयुष्यखंड रविजाई

कुरतडले जातीकीं स्वजीवनाचे असे सदा तुकडे
जीवन झिजतेघटते जीवविचार न वळेपरी तिकडे

आयुष्यांतील एक वर्ष गेले म्हणून हळहळ वाटावयास हवी, आणि नववर्षांत जास्त दक्ष, सावध व जागृत रहाण्याचा विवेक सुचावयास हवा. याची यत्किञ्चितहि जाणीव नसणारी महामूर्ख मानवजात म्हणते,Happy birth day to you

५) सद्यकाळांतील साधुसंत, ज्ञानी महात्मे यांच्या पुण्यतिथ्या उदाहरणार्थ महात्मा गांधी, विनोबा, अरविंद, जे. कृष्णमूर्ति, रमणमहर्षि. त्याचप्रमाणें महत्वाचे दिन उदा०संयुक्त महाराष्ट्र दिन, शिवराज्याभिषेकोत्सव दिन. यासाठीं त्या त्या सालांतील पंचांगें पाहून तिथिनिश्चय केला आहे.

व तसा तो दिनदर्शिकेंत नोंदविला आहे. या दिनदर्शिकेंतील कोणतेहि दिन इंग्रजी तारखे प्रमाणें असणार नाहीत. उदा० महात्मा गांधींचें देहावसान हिंदू पंचांगानुसार ‘पौष कृष्ण५,पंचमी शके १८६९’ या वर्षी झाले. म्हणून त्यांची पुण्यतिथि ‘पौष कृष्ण ५, पंचमी’ ही ठरते. ‘शिवराज्याभिषेक दिन’ ‘ज्येष्ठ शुद्ध १३, त्रयोदशी’ तसेच ‘महाराष्ट्र दिन’ ‘वैशाख शुद्ध ५, पंचमी वसंतऋतु’ असा येतो. हा ‘संयुक्त महाराष्ट्र दिन’ महाराष्ट्राच्या अनेकविध गुण-गौरवांत घालवावा. याचा तपशील असा—

१) पंचांगानुसार दिनक्रम ठेवण्यासाठीं त्याची आणि ज्योतिषशास्त्राची प्राथमिक माहिती.

.२) मराठी भाषा व व्याकरणाचा शास्त्रशुद्ध अभ्यास.

३) प्राचीन व अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास.

४) मोडी लिपी हें शिवकालखंड जाणून घेण्याचें एक बहुमोल साधन आहे. यासाठीं मुळाक्षरापासून मोडी लिपीचा अभ्यास.

५) महाराष्ट्राच्या भौगोलिक आणि इतर माहितीसाठीं पुस्तकें, ‘महाराष्ट्र दर्शन’—शासकीय प्रकाशन. नकाशा वाचन. ‘महाराष्ट्र दर्शन’ गो. नी. दांडेकर. तसेच त्यांचें ‘दुर्गभ्रमणगाथा’

६).शिवछत्रपतींच्या संबंधीं सर्व वाङ्मयाचें अवलोकन.

७) शिव-समर्थ यांच्यावरील अनेकविध ध्वनिमुद्रिकांचें श्रवण.

इत्यादि सर्व कार्यक्रमांत तो दिवस अत्यंत श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणानें घालवावा.

आम्ही इंग्रजी वर्ष हें ‘कमर्शिअल यिअर’ म्हणून समजतो. ते भारताचें म्हणजेच हिंदूंचें सांस्कृतिक वर्ष आहे असे आम्ही मानीत नाही. तें जागतिक राजकारण, अर्थकारण, समाजकारण इत्यादि व्यवहारांचें जागतिक वर्ष म्हणून या आमच्या दिनदर्शिकेंत आम्ही नमूद

केले आहे. यासाठीं दिनदर्शिकेंत प्रत्येक रकान्याच्या उजव्या कोपऱ्यांत अगदी बारीक अक्षरांत इंग्रजी महिना व तारखा दिल्या आहेत. हे तारखांचे अंक मराठींमध्यें दिले आहेत.

१५ ऑगष्ट आणि २६ जानेवारी इत्यादि मूर्खपणाला, वेडेपणाला सर्वस्वी नकार दिला आहे. मी ही हिंदू दिनदर्शिकेची वैशिष्ठें सांगतो आहे. आम्ही आपली आयडेंटिटी, आपली ओळख पूर्णपणें विसरलो आहोत. आम्हाला धर्माचें, स्वधर्माचें भान नाही. इतकेच नव्हें, तर तो आम्हांस दोषरूप वाटूं लागला आहे. त्यांत गुणदर्शन करणें {वैशिष्ठें Pecularities} हाच आमच्यापुढील एकमेव कार्यक्रम आहे. यासाठीं आम्ही चार भिंतीच्या आंत हिंदू म्हणून जगणार हिंदू धर्म, हिंदू संस्कृति, हिंदू धारणा यांचा सर्व-भावें स्वीकार करणार. राज्यपातळीवर स्वत:ला महाराष्ट्रीय आणि राष्ट्रीय पातळीवर भारतीय म्हणवून घेणार; यांत आम्हाला कसलीहि दिक्कत वाटत नाही. सेक्युलर राष्ट्र, .सर्वधर्मसमभाव,

जातीय ऐक्य असल्या भंपक तत्त्वांना आमच्या हृदयांत काडीइतकेहि स्थान असणार नाही. मात्र व्यवहारांत वागताना आम्ही याविरूद्ध बोलणार नाही, याबाजूनेहि बोलणार नाही. आम्ही मौन राहूं. आणि या भंपक तत्त्वानुसार न वागतां हिंदू धर्माच्या मूळच्याच उदार धोरणानें वर्तन करूं. उदाहरणार्थ मशिदींना देणग्या देऊं. मुस्लीम बांधवांना मदत करूं. मात्र 'ईश्वर अल्ला तेरे नाम' असला गजर आमच्या तत्त्वांत बसत नाही.

ही दिनदर्शिका सार्वजनिक नाही. केवळ वैयक्तिक पातळीवरील आहे. त्यामुळें ही विक्री-साठीं, म्हणजेच कांहीं मूल्य घेऊन कोणालाहि देता येणार नाही. ही निव्वळ वैयक्तिक स्वरूपांत असून इचें मित्रमंडळींत व स्नेह परिवारांत 'विनामूल्य स्नेहोपायन' या रूपानें वितरण होईल.

महाराष्ट्रीय जीवनांत 'शालिवाहन शक' या वर्षगणनेला स्थान आहे. माझ्या मतें भारतीय युद्ध झाल्यानंतर युधिष्ठिराला राज्याभिषेक

झाला. त्या राज्याभिषेकापासून जी कालगणना सुरूं झाली त्याला ‘युधिष्ठिर शक’ म्हणतात. या वर्षाचा हा शक ५१०५ हा आहे. हा सर्वांत प्राचीन शक आहे.

युधिष्ठिर राज्यशासनानंतर बौद्ध, जैन, शैव, नाथ इत्यादि संप्रदाय-परंपरा भारतीय जीवनांत समाविष्ट झाल्या. आम्हांस त्या नको आहेत. महाभारती जीवनास अनुसरणारी ती खरी हिंदू जीवनपद्धति आहे, असे आमचें मत आहे. त्यामुळें अनेक संस्करणें होऊनहि ‘श्रीमत्‌भगवत्‌ गीता’ हाच हिंदू धर्माचा मुख्य ग्रंथ सिद्ध झाला आहे. भागवत धर्महि महाभारत कालानंतरचा आहे. गीतेच्या अध्याय ९ मधील भक्तिमार्ग महाभारतकालीन ठरतो. शिव-समर्थांची मनो-रचना व एकूण तो कालखंड महाभारत काल-खंडाला पूर्णार्थानें अनुरूप वाटतो. बौद्ध, जैन, भागवत यांची छायासुद्धा त्यांत जाणवत नाही. इतकेच नव्हें तर महाभारताच्याहि पुढे त्यानें बरीच पावलें टाकली आहेत. भीष्म, द्रोण, कर्ण युधिष्ठिर यांच्या सारखा अव्यवहारी वेडेपणा

त्यांत नाही. शिवकालखंड पराकाष्ठेचा तत्त्वनिष्ठ असूनहि पूर्णार्थानें व्यवहारी आहे. नाहींतर प्रतापराव, मराठी सैन्याचे सरसेनापती, एवढया मोठया अधिकारपदावर असणाऱ्या व्यक्तीवर संतापून 'सला काय निमित्ते केला? खानास गर्देस मेळवा; अन्यथा आम्हास तोंड दाखवूं नका.' असा भयंकर पाणउतारा करून महाराज उखडले नसते.जातीबांधव असणाऱ्या मुधोळच्या घोरपडयांना कंठस्नान घातलें नसतें. आणि खंडोजी खोपडयाचा एक हात, एक पाय कलम केला नसता. महाभारत कालापासून भारतीय इतिहासांत झालेल्या अनेक चुका महाराजांनी कटाक्षाने टाळल्या. कोणत्याहि बाबतींत इतिहासाची पुनरावृत्ति होऊं दिली नाही. जीवन हाच एक संग्राम आहे. म्हणून 'गनिमी कावा' हें युद्धतंत्र अखिल जीवनाला लागू होणारे व्यापक तत्त्व आहे.

एक तें हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषयी ।। महाराष्ट्राची खरी उन्नति साधायची असेल तर शिव-समर्थ हाच आदर्श समोर

ठेवावा लागेल.कारण हीच जीवन-पद्धति अंतीम कल्याणकारी होणारी आहे. जी भव्यता व त्यागाकडे झुकणारी असेल तीच जीवन कलहांत टिकेल. अमाप वैभव व प्रचंड सामर्थ्य असणारी पेशवाई रम्यता व भोगाकडे झुकल्यामुळें तिचा हळुहळु ऱ्हास होत गेला. साध्या राहणीनें राष्ट्राची उन्नति होते आणि चैनबाजीनें त्याचा ऱ्हास होतो.—प्रसिद्ध इतिहासकार गिबन. त्याचे हे उद्‌गार आहेत.

विक्रम संवत् इसवीसनपूर्व ५८ व्या वर्षी सुरूं झाला. म्हणजे इतका तो प्राचीन आहे. शालिवाहन शक इसवीसनानंतर ७८ वर्षांनी सुरूं झाला. महाराष्ट्राचा परमभूषण असलेला शिवशक इसवीसन १६७४ पासून सुरूं होतो. या वर्षी शिवशक ३३० आहे. ‘‘ज्ञानदेवी प्रकट दिन’’ म्हणजेच ‘ज्ञानदेवशक’ इसवीसन १२९० पासून सुरूं होतो. या वर्षी ज्ञानदेवशक ७१४ आहे. युधिष्ठिर शक ५१०५ आहे.

आम्ही स्वत:ला हिंदू म्हणवतो, महाराष्ट्रीय संबोधतो, ही आमची जन्मापासून लाभलेली प्रकृति आहे. ही आम्ही मुद्दाम स्वीकारलेली गोष्ट नाही. हा आमचा धर्म आहे, स्वधर्म आहे. ही आमची विशिष्ठ भूमिका आहे. आणि व्यापकाचा विशिष्ठाशीं विरोध नसतो तर त्याचा संकुचिततेशीं विरोध असतो. आम्ही आमची विशिष्ठता जपली नाही तर आमची आयडेंटिटी, आमची ओळखच आम्ही गमावून बसूं. आणि असे घडेल तर आमचें अस्तित्त्वच नष्ट होईल. अंत:करणांत संकुचितता नसेल, त्यांत उदारता असेल तर विशिष्ठाचा आग्रह दोषरूप न होतां उन्नतीला खऱ्याअर्थी सहाय्यक होतो. मानवता, विश्वबंधुता, समता ही अव्यवहारी तत्त्वप्रणाली आहे. स्वधर्म पालनांत संकुचितता नसेल तर वरील तत्त्वांचें आपातत: पालन होते व जीवन धन्य होते. केवळ वरील तत्त्वावरच जीवनाची द्वारका उभारणें म्हणजे हवेंत अधर लोंबकळण्यासारखे आहे. अशांच्या हातीं तत्त्वांचा कोरडा उद्घोष करण्यापलीकडे कांहींहि येत नाही. जीवन व्यर्थ होते. भारतीय

इतिहासांत अशा चुका फार झाल्या आहेत. उदा० कर्णाचें दान, अशोकाची अहिंसा, अमूर्त तत्त्वावर उभा असलेला बुद्धधर्म. यासाठीं—

'शिव-समर्थ स्मरण हें महाराष्ट्राचें जीवन आहे.' या जीवन-पद्धतीचें विस्मरण झाल्यामुळें पेशवाई एवढी वैभवसंपन्न असूनहि मृत्युपंथास लागून अखेर तिचा नाश झाला.

इति लेखनसीमा

. आप्पा ठोंबरे.

शके १९२५

दिनांक : २५/१२/२००५